देऊळघाट-धाड व सहा गावे, प्रादेशिक नळ पाणी पुरवठा योजनेच्या (तालुका व जिल्हा बुलडाणा) अंदाजपत्रकास सुधारीत प्रशासकीय मान्यता देणेबाबत

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

## शासन निर्णय क्रमांकः सुप्रमा-२११३/प्र.क्र.१५२/पापु-१३

मंत्रालय,नवीन प्रशासकीय इमारत,मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२
तारीख: १६ जुलै, २०१८

वाचा -

१) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांचे पत्र क्र. मजीप्रा/सस/तांशा-२/१३०४/५३८ दिनांक २५.०३.२०१३
२) शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांकः पागुण २००९/प्र.क्र.१९/पापु-१० दिनांक ०५.०८.२००९
३) मुख्य अभियंता,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,प्रादेशिक विभाग, अमरावती, यांचे सुधारीत तांत्रिक मंजुरीचे पत्र क्र.मुअ/मजीप्रा/अम/तांशा-१/४० दिनांक १८.०५.२०१५
४) शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांकः ग्रापाधो-१११११/प्र.क्र.१३४/पापु-०७, दिनांक २०.०२.२०१५
५) ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या त्रयस्थ तांत्रिक परिक्षणाबाबतचा शासन निर्णय ग्रापाधो-१११४/प्र.क्र.६१/पापु-०७, दिनांक १५.०६.२०१५ व दिनांक १४.०३.२०१६.

प्रस्तावना -

देऊळघाट-धाड व सहा गावे, प्रादेशिक नळ पाणी पुरवठा योजनेच्या (तालुका व जिल्हा बुलडाणा) अंदाजपत्रकास संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. तथापि योजनेची जादा दराची निविदा स्वीकारल्याने तसेच योजनेत तांत्रिक बदल व कामाच्या व्याप्तीत झालेल्या बदलामुळे आणि अन्य अपरिहार्य कारणांमुळे योजनेच्या कामात वाढ झाली असल्याने मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, प्रादेशिक विभाग, अमरावती यांनी संदर्भ क्र.३ येथील पत्रान्वये प्रस्तुत योजनेच्या रु.२७,०४,९५,४६६/- (ढोबळ) किंमतीच्या प्रस्तावास सुधारीत तांत्रिक

मान्यता दिली आहे. तद्नुषंगाने प्रस्तुत नळ पाणी पुरवठा योजनेच्या आराखडयास व अंदाजपत्रकास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, प्रादेशिक विभाग, अमरावती यांनी सादर केलेल्या प्रस्तावाची छाननी केल्यानंतर देऊळघाट-धाड व सहा गावे, तालुका व जिल्हा बुलडाणा प्रादेशिक नळ पाणी पुरवठा योजनेची सुधारीत किंमत पुढील प्रमाणे होत आहे.

| | |
|---|---|
| मुळ प्रशासकीय मान्यता | रु. १०,१९,२५,४१०/- |
| वाढीव रक्कम | रु. ९,०१,६३,२५२/- |
| सुधारीत योजनेची किंमत | रु. १९,२०,८८,६६२/-(९% ई.टी.पी.चार्जेस सह)<br>(दर सूची २००९-१०) |

देऊळघाट-धाड व सहा गावे, प्रादेशिक नळ पाणी पुरवठा योजनेच्या रु. १९,२०,८८,६६२/- (अक्षरी रुपये एकोणिस कोटी, वीस लाख, अठठयाऐंशी हजार, सहाशे बासष्ट फक्त ) एवढया किंमतीच्या सुधारीत अंदाजपत्रकास पुढील अटींच्या अधीन राहुन प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**अटी-**

१. उपरोक्त नमूद सुधारीत किंमतीच्या मर्यादेत योजनेची उर्वरित सर्व कामे महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने सहा महिन्यात पूर्ण करावीत.
२. या योजनेस मूळ प्रशासकीय मान्यता देतांना तसेच सुधारीत तांत्रिक मान्यता देतांना नमूद केलेल्या अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.
३. सदर योजनेची अंमलबजावणी, कार्यान्वयन, देखभाल दुरुस्ती व पाणीपट्टी वसुली महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने करावयाची आहे.
४. संदर्भ क्र.२ येथील योजनेच्या मुळ प्रशासकीय मान्यतेच्या शासन निर्णयातील अट क्र.५ मध्ये नमूद केल्याप्रमाणे योजनेची शीर्ष कामे, जलशुद्धीकरण केंद्र , गुरुत्ववाहिनी, गावातील पाण्याच्या टाक्या व वितरण व्यवस्था ईत्यादींचे काम पुर्ण करुन यशस्वी चाचणी दिल्यानंतर योजनेचे कार्यान्वयन, देखभाल दुरुस्ती व पाणी पट्टी वसुलीचे काम पुढील दोन वर्षे, काम पुर्ण केलेल्या कंत्राटदारामार्फत करणे बंधनकारक राहील.

५. ही योजना प्रत्यक्षात पूर्ण झाल्यावर लगेच, संबधित अधिक्षक अभियंता , महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मंडळ अकोला, कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, बुलडाणा व संबंधित कंत्राटदार यांनी योजनेची संयुक्तपणे पाहणी करावी आणि अशा पाहणीत कोणतेही दोष आढळून आल्यास ते दूर करण्याची खबरदारी घेण्यात यावी. उपरोक्त अट क्र.४ मध्ये नमूद केल्याप्रमाणे दोन वर्षाच्या मुदतीनंतर योजना ताब्यात घेण्यापूर्वी योजना सुस्थितीत असल्याची खातरजमा करुन घेण्याची जबाबदारी संबधित अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मंडळ अकोला व कार्यकारी अभियंता महाराष्ट्र जीवन प्राधिकरण बुलडाणा यांची राहील.

६. ही योजना राबविणे, योजनेचे परिरक्षण , दुरुस्त्या (विशेष दुरुस्त्या धरुन ) यासाठी दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी योजनेतील घसारा किंवा यंत्रसामुग्रीसाठी महाराष्ट्र जीवन प्राधिकरण/ संबंधित ग्रामपंचायतीस /जिल्हा परिषदेस शासनाकडून कोणतीही मदत मिळणार नाही.

७. संदर्भ क्र.२ येथील योजनेच्या मुळ प्रशासकीय मान्यतेच्या शासन निर्णयातील अट क्र.८ मध्ये नमूद केल्याप्रमाणे योजनेची अंमलबजावणी, कार्यान्वयन, देखभाल व दुरुस्ती तसेच पाणी पट्टीचे दर ठरविणे व पाणी पट्टी वसूल करणे इत्यादी कामे चांगल्या प्रकारे व गुणवत्तापुर्वक होण्याच्या दृष्टीने त्या भागातील लोकप्रतिनिधी, जिल्हा परिषदेचे पदाधिकारी/अधिकारी तसेच महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे अधिकारी मिळून “प्रकल्प अंमलबजावणी व व्यवस्थापन ” समिती स्थापन करणे बंधनकारक राहील.

८. सन २०१३ मधील CAG च्या अहवालानुसार राज्यातील २१ % पाणी पुरवठा योजना या देखभाल न केल्यामुळे, वीज देयक न भरल्यामुळे (poor/non-payment of electricity bills) बंद पडल्या असल्याचे दिसून येते. यास्तव सदर योजना आर्थिकदृष्टया सक्षम राहण्याच्या दृष्टीने पाणीपट्टीच्या दरामध्ये आवश्कतेनुसार वाढ करण्याची जबाबदारी संबंधित ग्राम पंचायत/ जिल्हा परिषद यांची राहील.

९. हगणदारीबाबतच्या प्रचलित धोरणानुसार कार्यवाही करण्यात यावी.

१०. संदर्भ क्र.५ येथील शासन निर्णयातील निर्देशानुसार त्रयस्थ तांत्रिक परिक्षणाची कार्यवाही करण्यात यावी.

११. प्रस्तुत योजनेचे काम प्रशासकीय मान्यतेच्या किंमतीच्या मर्यादेत पूर्ण करण्यात यावे. तसेच योजना कोणत्याही परिस्थितीत पुनर्सुधारीत केली जाणार नाही याची जबाबदारी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाची राहील.

१२. ग्रामसभा ठराव/हमीपत्र दिल्यानंतरही एखादया गावाने पाणी घेण्यास नकार दिला तरी त्या गावाकडून किमान ७५%टक्के पाणीपट्टी वसूल करण्यात यावी. याबाबत ग्रामस्थांना निविदा प्रक्रियेच्या अगोदरच कल्पना देण्यात यावी.

१३. सदर योजनेचा वापर हंगामी स्वरुपात होऊ नये याकरिता योजनेत समाविष्ट गावातील अस्तित्वातील योजना चालविण्यात येऊ नयेत. तसेच समाविष्ट गावातील अस्तित्वातील योजनेची पंपिग मशिनरी व वीज जोडणी काढून टाकण्यात यावी.

२. या योजनेच्या सुधारीत किमतीतील वाढीव खर्च रु. रु. ९,०१,६३,२५२/- (अक्षरी नऊ कोटी एक लाख त्रेसष्ट हजार दोनशे बावन्न फक्त) हा राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमाखालील राज्य हिश्श्यातून /जिल्हा नियोजन मंडळाकडून /किमान गरजा कार्यक्रमांतर्गत उपलब्ध होणा-या निधीतून करण्यात यावा.

३. हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ५०/१४४३ दिनांक १४.४.२०१७ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ १७०/व्यय-३ दिनांक २७.६.२०१८ अन्वये मिळालेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०७१६१०३५१५७६२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vasant Bhimrao Mane

Digitally signed by Vasant Bhimrao Mane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=280e2beac20f526041fee94f6226522e1407a7f6aa0b06c8769634d48c2976bc, cn=Vasant Bhimrao Mane
Date: 2018.07.16 12:38:06 +05'30'

**(वसंत भि. माने)**
अवर सचिव,महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,

२. मा.राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्व्च्छता विभाग,

३. मा. विधानमंडळ सदस्य (सर्व)

४. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.

५. जिल्हाधिकारी, बुलडाणा

६. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बुलडाणा

७. महालेखापाल,लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२ नागपूर.

८. महालेखापाल,लेखा परिक्षा, महाराष्ट्र-१ मुंबई.

९. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, ,बेलापुर, नवी मुंबई.

१०. मुख्य अभियंता,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, अमरावती

११.अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, अकोला

१२. संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडकोभवन, बेलापुर, नवी मुंबई.

१३.उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा,अमरावती

१४.वरिष्ट भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा,बुलडाणा

१५.कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,बुलडाणा

१६.कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, बुलडाणा

१७. अतिरिक्त मुख्य सचिव,नियोजन विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

१८ प्रधान सचिव, वित्त विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

१९ मु.अ.तथा वि.का.अ पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचेस्वीय सहायक,मंत्रालय,मुंबई

२० कक्ष अधिकारी (कार्या१४४३), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई

२१ कक्ष अधिकारी (व्यय-३) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई

२२ कार्यासने (पापु-४,६,७,१०,१७,,१८,१९ व २०) पा.पु.स्व.वि.मंत्रालय, मुंबई-३२

२३ निवडनस्ती कार्यासन पापु-१३.